नगरोत्थान महाभियानांतर्गत पाणीपुरवठा व मलनिःस्सारण प्रकल्पांच्या अंमलबजावणीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक नगरो-२०२४/प्र.क्र.२३३/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक :- २८ मार्च, २०२४**

**संदर्भ** :-

१. नगर विकास विभागाचे शासन परिपत्रक क्र. अमृत-२०२२/प्र.क्र.२६९/नवि-३३, दिनांक १९/१०/२०२२.
२. नगर विकास विभागाचा शासन निर्णय क्र: नगरो २०२३/प्र.क्र.३८९/नवि-३३, दिनांक २२/०२/२०२४.
३. नगर विकास विभागाचे शासन परिपत्रक क्र. अमृत-२०२४/प्र.क्र.२०१/नवि-३३, दिनांक १३/०३/२०२४

**परिपत्रक**

अमृत २.० अभियानाच्या धर्तीवर नगरोत्थान महाभियानाची नवीन स्वरूपात अंमलबजावणी करण्यास शासनाने संदर्भाधीन दि. २२ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूरी प्रदान केलेली आहे. नगरोत्थान महाभियानांतर्गत प्रकल्पांना मान्यता प्रदान करण्यासाठी प्रधान सचिव (नवि-२) यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समिती (SLSC) गठीत केलेली आहे तसेच, या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ९.४ व १२ मध्ये प्रकल्प मंजूर करण्याची कार्यपध्दती विहित केली आहे. त्याचप्रमाणे, संदर्भाधीन दिनांक १९ ऑक्टोबर, २०२३ रोजीच्या परिपत्रकान्वये पाणी पुरवठा व मलनिःस्सारण प्रकल्पांकरिता आदर्श निविदा पुस्तिका विहित केली होती व त्यानंतर संदर्भाधीन दिनांक १३ मार्च, २०२४ रोजीच्या परिपत्रकान्वये या प्रकल्पांकरिता सुधारीत आदर्श निविदा पुस्तिका विहित केलेली आहे या पार्श्वभूमीवर नगरोत्थान अभियानांतर्गत राबवावयाच्या प्रकल्पांकरिता अनुसरावयाच्या कार्यपद्धतीबाबत पुढील सूचना देण्यात येत आहेत :-

१. नगरोत्थान महाभियानांतर्गत प्रकल्पांच्या निविदा प्रक्रियेसाठी या विभागाच्या दिनांक १३ मार्च, २०२४ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये उपलब्ध करुन दिलेल्या सुधारीत आदर्श निविदा पुस्तिकेनुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने निविदा (RFP) तयार करून नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीच्या मंजुरीसाठी सादर करावी.
२. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी सादर केलेल्या निविदांचे प्रारूप नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने तपासून आपल्या अभिप्रायांसह राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीच्या मंजुरीसाठी निविदेचे प्रारूप सादर करावे. समितीच्या मंजुरीनुसार व शिफारशीप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने निविदा प्रक्रिया राबवावी.

३. निविदा प्रक्रियेनंतर नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने प्राप्त झालेल्या निविदांचे मूल्यमापन करावे तसेच निविदेस नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या सक्षम स्तरावर मंजूरी घेऊन निविदा नगरपरिषद प्रशासन संचालनालयामार्फत सादर करावी.

४. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी सादर केलेल्या निविदांची नगरपरिषद प्रशासन संचालनालयाने छाननी करून आपल्या अभिप्रायांसह राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीच्या अंतिम मान्यतेसाठी निविदा सादर करावी व समितीच्या मान्यतेनंतर संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने प्रकल्पाचे कार्यादेश द्यावेत.

५. या अभियानांतर्गत मंजूर प्रकल्पांची निविदा प्रक्रिया केंद्रीय दक्षता आयोगाच्या (Central Vigilance Commission) मार्गदर्शक सूचनांनुसार तसेच, या संदर्भात शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार राबवावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३२८११५२०७३५२५ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SHRIKANT CHANDRAKANT ANDGE

Digitally signed by SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
Date: 2024.03.28 12:18:19 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२), मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई.
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६. विभागीय आयुक्त, सर्व विभाग.
७. आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
८. जिल्हाधिकारी (सर्व)
९. सर्व मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१०. जिल्हा प्रशासन अधिकारी (सर्व).
११. मुख्याधिकारी, नगरपरिषद / नगरपंचायत (सर्व).
१२. निवड नस्ती, नवि-३३.